महाराष्ट्र धारण जमीनीचे तुकडे पाडण्यास प्रतिबंध करण्याबाबत व त्याचे एकत्रिकरण करण्याबाबत अधिनियम, १९४७ मध्ये करण्यात आलेल्या सुधारणांच्या अनुषंगाने आकारण्यात येणारे नियमाधीकरण अधिमूल्य जमा करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः राभूअ-२०१६/प्र.क्र.३४७/ल-१**
पहिला मजला, मुख्य इमारत, मंत्रालय,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई-४०००३२.
दिनांक : ०१ नोव्हेंबर, २०१८

**प्रस्तावना :-**

महसूल विभागाकडून मुख्यत्वे करुन "००२९-जमीन महसूल"या लेखाशीर्षाखाली जमीन महसूल वसूल करुन शासन जमा करण्यात येतो. महाराष्ट्र धारण जमीनीचे तुकडे पाडण्यास प्रतिबंध करण्याबाबत व त्याचे एकत्रिकरण करण्याबाबत अधिनियम, १९४७ मध्ये महाराष्ट्र अधिनियम क्र.५८/२०१७ अन्वये करण्यात आलेल्या सुधारणांच्या अनुषंगाने आकारण्यात येणारे नियमाधीनकरण अधिमूल्य जमा करण्याबाबत सदर लेखाशीर्षांतर्गत नवीन उपशीर्षे निर्माण करण्याबाबतची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुषंगाने शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतलेला आहे.

**शासन निर्णय :-**

महाराष्ट्र धारण जमीनीचे तुकडे पाडण्यास प्रतिबंध करण्याबाबत व त्याचे एकत्रिकरण करण्याबाबत अधिनियम, १९४७ च्या कलम ९ मध्ये महाराष्ट्र अधिनियम क्र.५८/२०१७ अन्वये करण्यात आलेल्या सुधारणांच्या अनुषंगाने आकारण्यात येणारे नियमाधिनकरण अधिमुल्य जमा करण्याबाबत नविन लेखाशीर्ष उघडण्यासाठी काही कालावधी लागणार असल्याने सद्यस्थितीत सदर सुधारणेच्या अनुषंगाने आकारण्यात येणारे नियमाधीनकरण अधिमूल्याच्या रकमा खालील तक्त्यात नमूद केलेल्या योजना सांकेतांकानुसार शासनजमा करण्यात याव्यात :-

| अ.क्र. | मुख्य लेखाशीर्ष | उपशीर्ष | योजना सांकेतांक |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १ | ००२९-जमीन महसूल<br>८००-इतर जमा रकमा<br>(१६)-संकीर्ण | (१६) (०१) आयुक्त, कोकण | ००२९ १६६६ |
| | | (१६) (०२) आयुक्त, नाशिक | ००२९ १६७५ |
| | | (१६) (०३) आयुक्त, पुणे | ००२९ १६८४ |
| | | (१६) (०४) आयुक्त, अमरावती | ००२९ १६९३ |
| | | (१६) (०५) आयुक्त, नागपूर | ००२९ १७०१ |
| | | (१६) (०६) आयुक्त, औरंगाबाद | ००२९ १७१९ |

२. नविन लेखाशीर्ष उघडण्यात आल्यानंतर यथा अवकाश त्यानुषंगाने शासन आदेश निर्गमित करण्यात येईल.

३. सदर शासन निर्णयातील सूचना सर्व विभागीय आयुक्त यांनी त्यांच्या अधिनस्त सर्व महसूल अधिकारी व कर्मचारी यांच्या निदर्शनास आणून द्याव्यात.

४. GRAS प्रणालीमार्फत सदर लेखाशीर्षाखाली जमा करण्यात येणाऱ्या रकमा नागरिकांकडूनही ऑनलाईन पध्दतीने भरण्यात येतात. यास्तव जनतेच्या माहितीसाठी सदर शासन निर्णयास जिल्हास्तरावर तसेच तालुकास्तरावर व्यापक प्रसिध्दी देण्यात यावी. याबाबतची जबाबदारी जिल्हास्तरावर जिल्हाधिकारी यांची तसेच तालुकास्तरावर तहसिलदार यांची राहील.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८११०११६१९०७५९१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Santosh Haridasrao Bhogle

Digitally signed by Santosh Haridasrao Bhogle
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue And Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=cfe36679ae12922422bc5e7f7d277841f1fe67725f465c272fd6727259260b3d, cn=Santosh Haridasrao Bhogle
Date: 2018.11.01 16:25:12 +05'30'

**(डॉ. संतोष भोगले)**
सह सचिव

**प्रति,**

१. सर्व विभागीय आयुक्त
२. जमाबंदी आयुक्त आणि संचालक, भूमी अभिलेख, पुणे
३. संचालक, लेखा व कोषागारे, नवीन शासकीय कुटीर क्र.१५ व १६, प्लॉट क्र.१७६, फ्री प्रेस जर्नल मार्ग, मुंबई-४०० ०२१.
४. सर्व जिल्हाधिकारी
५. कोषागार अधिकारी, व्हर्च्युअल ट्रेझरी, शासकीय कुटीर क्र.११, प्लॉट क्र.१७६,फ्री प्रेस जर्नल मार्ग, मुंबई-४०० ०२१.

**प्रत :-**

१) मा.राज्यपालांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई-४०००३५.
२) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई-४०००३२.
३) मा.मंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-४०००३२.

४) मा.राज्यमंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-४०००३२.

५) मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई-४०००३२.

६) अ.मु.स.(वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-४०००३२.

७) प्र.स.(महसूल) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई-४०००३२.

८) मा.महालेखापाल १ / २ (लेखापरिक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर

९) मा.महालेखापाल १ / २ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर

१०) सह संचालक, लेखा व कोषागारे, कोकण/ पुणे/ नाशिक/ अमरावती/ नागपूर/ औरंगाबाद

११) सह संचालक, स्थानिक निधी लेखा, मुंबई/ पुणे/ नाशिक/ अमरावती/ नागपूर/ औरंगाबाद

१२) निवडनस्ती, ल-१ कार्यासन